आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत इंग्रजी माध्यमाच्या नामांकित निवासी शाळा या योजनेतंर्गत निधी वितरण (२२२५ सी ९९९ )

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**

शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२०/ प्र.क्र. ०१ / कार्यासन-६
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- २० जुलै , २०२०.

वाचा -

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४ /अर्थ-३, दि.१६.०४.२०२०.
२) आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांचे पत्र क्र.नानिशा-२०१९/ प्र.क्र. / का-६(६), दि.१५.०५.२०२०.
३) आदिवासी विकास विभाग, नस्ती क्रमांक नानिशा-२०२०/ प्र.क्र.१६/का-१२.

**शासन निर्णय:-**

वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ येथील दिनांक १६ एप्रिल,२०२० रोजीच्या परिपत्रकान्वये राज्यात कोरोना विषाणूमुळे उद्भवलेली महामारीची परिस्थिती विचारात घेऊन सन २०२०-२१ या आर्थिक वर्षाच्या पहिल्या ३ महिन्याकरिता अनिवार्य व कार्यक्रम खर्चाच्या योजनांच्या एकूण वार्षिक अर्थसंकल्पित तरतूदींच्या १५ ते २५ टक्क्यांच्या मर्यादेत निधी वितरीत करण्यास मंजूरी देण्यात आली आहे..

आयुक्त, आदिवासी विकास यांच्या संदर्भाधीन क्र.२ येथील पत्रान्वये विभागाच्या अधिनस्त नामांकित निवासी शाळांकरीता सन २०१९-२० या शैक्षणिक वर्षातील प्रलंबित शुल्क अदा करण्याकरीता निधी उपलब्ध करून देण्याबाबतचा प्रस्ताव शासनास प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावास अनुसरून सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत मागणी क्रमांक टी-५ अंतर्गत (०२) (२९)-अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना इंग्रजी माध्यमाच्या नामांकित निवासी शाळांमध्ये शिक्षण देणे (२२२५ सी ९९९), बाब क्र. ३१- सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) याखाली अर्थसंकल्पित रूपये ३६०.०० कोटी इतक्या तरतूदीतून रूपये ८१.४१ कोटी ( अक्षरी रूपये एक्क्याऐंशी कोटी एक्केचाळीस लाख फक्त ) इतका निधी नियंत्रक अधिकारी तथा आयुक्त, आदिवासी विकास नाशिक यांना वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर निधी अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. लॉक डाऊनमुळे पुढील काही कालावधीसाठी राज्याची आर्थिक स्थिती गंभीर स्वरूपाची राहण्याची शक्यता असल्याने सदर वितरीत निधी खर्च करतांना नियंत्रक अधिकारी यांनी विहित पद्धतीने काटकसरीच्या उपाय योजना करुन खर्च करावा. सदर निधीचा वापर विभागांतर्गत नामांकित निवासी शाळांबाबतच्या ऑनलाईन प्रणालीवर तयार झालेल्या सन २०१९-२० या शैक्षणिक वर्षातील प्रलंबित शुल्क देयकांच्या अदायगीसाठीच करण्यात यावा.

३. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करतांना नियंत्रक अधिकारी यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तिय नियम

तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१६.०४.२०२० च्या शासन परिपत्रकातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि.१६.०४.२०२० रोजीच्या शासन परिपत्रकातील मार्गदर्शक सुचना व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१८३/२०२०/व्यय-१४, दि.१८.०६.२०२० अन्वये दर्शविलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००७१३१७०५४५७५२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ravindra Digambarro Aute

Digitally signed by Ravindra Digambarro Aute
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f05a6913f9dee1f453c9a1c5a89d8c4897737ba8e4ac0edf3f2c6e69e25f4108, cn=Ravindra Digambarro Aute
Date: 2020.07.20 13:40:11 +05'30'

(रविंद्र दि.औटे )

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव.
२. मा.राज्यमंत्री, आदिवासी विकास, यांचे खाजगी सचिव.
३. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
४. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / नागपूर / ठाणे / अमरावती.
५. महालेखापाल (लेखापरिक्षण) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई /नागपूर.
६. उपसचिव / कक्ष अधिकारी (का-१२), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
७. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
८. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
९. वित्त विभाग (कार्यासन व्यय-१४ व अर्थ-१९), मंत्रालय, मुंबई.
१०. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
११. निवड नस्ती (का-६).